**एसएसपीएम लाईफ टाइम हॉस्पीटल व मेडीकल कॉलेज, पडवे, ता.कुडाळ जि.सिंधुदूर्ग या प्रशिक्षण संस्थेस जिल्हा रूग्णालय, सिंधुदूर्ग येथील ३०० खाटा शैक्षणिक प्रयोजनार्थ अनुभवासाठी वापरण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण -०३१६ /प्र.क्र.४९/शिकाना/आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: १९ डिसेंबर, २०१६

वाचा

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-एचएसजी १६९०/प्र.क्र.९६/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.१९९०.**
२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-संकिर्ण २०१३/प्र.क्र.३०७/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.२०१३.**
३) **संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/एसएसपीएम लाईफटाईम/सिंधुदूर्ग/१९४९८-५०१/१६, दि.१४.१२.२०१६.**

शासन निर्णय

उपरोक्त संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रान्वये एसएसपीएम लाईफटाइम हॉस्पीटल व मेडीकल कॉलेज, पडवे, ता.कुडाळ जि.सिंधुदूर्ग या प्रशिक्षण संस्थेस जिल्हा रूग्णालय, सिंधुदूर्ग येथील ३०० खाटा शैक्षणिक प्रयोजनार्थ अनुभवासाठी वापरण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयान्वये शासकीय रूग्णालयांच्या खाटा शैक्षणिक प्रयोजनासाठी खाजगी महाविद्यालयांना वापरण्यास देण्यासाठी मार्गदर्शक सूचना निश्चित करण्यात आल्या आहेत. त्यास अनुसरून एसएसपीएम लाईफटाइम हॉस्पीटल व मेडीकल कॉलेज, पडवे, ता.कुडाळ जि.सिंधुदूर्ग या प्रशिक्षण संस्थेस जिल्हा रूग्णालय, सिंधुदूर्ग येथील ३०० खाटा शैक्षणिक प्रयोजनार्थ अनुभवासाठी प्रतिदिन प्रतिखाट रुपये १५०/- इतक्या दराने खालील विहित अटी व शर्तींच्या अधिन राहून करारपत्राच्या दिनांकापासून पुढील ५ वर्षाकरिता वापरण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१) खाटांसाठी आकारावयाचे शुल्क रुपये १५०/- प्रति दिन प्रति खाटा याप्रमाणे संस्था दर तिमाहीच्या पहिल्या महिन्याच्या पहिल्या आठवडयात,तीन महिन्याच्या कालावधीसाठी अग्रिम स्वरुपात चुकते करील. खाटा वापरण्याच्या कालावधीत शासन ठरविल ते सुधारीत शुल्क त्या दिनांकापासून चुकते करण्याचे संस्थेवर बंधनकारक राहिल. तसे न केल्यास ही व्यवस्था रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम राहिल.
२) उपरोक्त दिनांक ०३.०८.१९९० च्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या करारपत्राच्या विहित नमून्याप्रमाणे संस्थेने उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर यांचेसमवेत करारपत्र करुन ते नोंदणीकृत करुन घ्यावे व या करारपत्रातील कोणत्याही अटींचे पालन न केल्यास किंवा अटीचा भंग झाल्यास ही व्यवस्था रद्द करण्यात येईलव याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम असेल.

३) तसेच सदर करारपत्र करण्यापूर्वी उक्त संस्थेस वैद्यकीय महाविद्यालय सुरु करणेबाबतच्या आवश्यक कागदपत्रांची पुर्तता केल्याबाबत उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर यांनी खातरजमा करावी. याशिवाय केवळ खाटा वापरण्यास देणेसंदर्भात संबंधित संस्थेकडून विहित नमून्याप्रमाणे हमीपत्र लिहून घ्यावे.

४) यासंदर्भात सार्वजनिक आरोग्य विभाग आणि वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग ह्यांनी वेळोवेळी निर्देशीत केल्याप्रमाणे अन्य अटी व शर्तींचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

५) संस्थेने एका आठवडयाच्या आत आवश्यक त्या त्रुटींची पूर्तता करणे बंधनकारक राहील. तसेच संस्थेकडून विहित वेळेत आवश्यक बाबींच्या त्रुटींची पुर्तता करुन घेण्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई व उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर यांची राहील.

२. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर यांनी संबंधीत संस्थेकडून करारपत्र तसेच प्रशासकीय बाबी पूर्ण करून घ्याव्यात व नंतरच पुढील कालावधीसाठी खाटांचा वापर करण्यास परवानगी द्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०५१६१०३८२४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87cfab3c12a61b33987277f837a341fb6c84ebe6d1bf10339d150649af95e5b8, cn=Ashok Tanbaji Uike
Date: 2016.12.19 19:43:48 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय मुंबई.
४. सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, सिंधुदूर्ग.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग.
९. प्राचार्य, एसएसपीएम लाईफटाइम हॉस्पीटल व मेडीकल कॉलेज, पडवे, ता.कुडाळ जि.सिंधुदूर्ग
१०. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-४)